**महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेखालील कामातील मजूरांमार्फत करावयाच्या अकुशल बाबींचे काम, काळ व वेग चा अभ्यास (Work Time Motion Study) करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
नियोजन विभाग
शासन निर्णय क्र. मग्रारोहयो- २०११/प्र.क्र.२३/रोहयो-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १५ एप्रिल, २०११

पहा:- १) शासन निर्णय क्र. ईजीएस-१०८३/१/कार्यासन-३७, दि. १२/१/१९८३.
२) अभ्यास गट अहवाल दि. १६/३/१९८३
३) केंद्र शासन अधिसूचना क्र. ६४, दि. १४/१/२००८
४) केंद्र शासनाचे अ.शा. पत्र क्र.जे-११०१/०२/०७.एनआरईजीए (पीटी), दि. २६.२.२००८
५) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र. मजुरी-२०११/प्र. १५/मग्रारो-१, दि. १९/३/२०११

**प्रस्तावना**:-

राज्याच्या रोजगार हमी योजनेखाली मजूरांमार्फत जी अकुशल कामे घेतली जात त्या बाबींचा काळ व वेग चा अभ्यास (Time motion study) वर उल्लेखिलेल्या दि. १२/१/१९८३ अनुसार करण्यात आला व अभ्यास गटाचा अहवाल शासनास दि. १६/३/१९८३ रोजी सादर केला. त्यानुसार बाबनिहाय Task निश्चित करण्यात येऊन दरसूची निश्चित करण्यात आली. त्यामध्ये अभ्यास गटाच्या अहवालाप्रमाणे ८७ (Items) बाबी समाविष्ट होत्या. तथापि, शासनास वेळोवेळी कामांच्या अंमलबजावणीच्या वेळेस आलेल्या अनुभवानुसार दरसूची सन १९८८ मध्ये ६४ बाबी, सन १९९४ मध्ये ६६ बाबी सन १९९८ मध्ये ६८ बाबी, सन २००४ मध्ये ३९ बाबी, सन २००७ मध्ये ४१ बाबींचा अंतर्भाव केला. सद्यःस्थितीत वर उल्लेखिलेल्या दि. १९/३/२०११ च्या दरसूचीत ४१ बाबींचा समावेश आहे. सदर दरसूची मग्रारोहयोच्या कामांना लागू आहे.

२. भारत सरकारने दि. २/२/२००६ पासून महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा २००५ देशातील सर्व जिल्हयांत टप्प्याटप्प्याने लागू केला. महाराष्ट्राने त्यातील कलम २८ प्रमाणे कार्यवाही करण्याचे निश्चित केले. त्यानुसार महाराष्ट्र रोजगार हमी कायदा १९७७ मध्ये आवश्यक त्या सुधारणा करुन महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना अंमलात आणली. केंद्र शासनाने त्यांची अधिसूचना दि. १४ जानेवारी, २००८ नुसार व पत्र दि. २६.२.२००८ नुसार कामाचे तास निश्चित केले, ते म्हणजे दिवसभरात ९ तास काम व त्यात १ तास विश्रांती. तसेच महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा २००५ च्या परिशिष्ट-१ मध्ये नवीन कलम ८अ अंतर्भूत केले ते असे की, "The average out turn of work put out by men

and women workers working in a group will be the basis for fixing task based schedule of rates so that there is no gender based discrimination in the schedule of rates" यानुसार केंद्र शासनाने त्यांचे पत्र दि. २६/२/२००८ अन्वये सर्व राज्यांना सूचना दिल्या की, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेकरिता म्हणजेच महाराष्ट्रात महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेकरिता करावयाच्या कामातील अकुशल बाबींचा काळ व वेगाचा नवीन (Fresh) अभ्यास करुन दरसूची निश्चित करावी. केंद्र शासनाचे आदेश व पूर्वीचा अभ्यास करुन २८ वर्षांचा कालावधी लोटला आहे. हे लक्षात घेता राज्य शासनाने मग्रारोहयोकरीता निश्चित केलेल्या बाबींचा काळ व वेग अभ्यास नव्याने करण्याचे ठरविले आहे.

## <u>निर्णय</u>

महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेखालील कामातील मजूरांमार्फत करावयाच्या अकुशल बाबींचे Task सन १९८३ मधील काम, काळ व वेग अभ्यासाप्रमाणे लागू आहेत. सद्यःस्थितीत त्यानुसार शासन निर्णय नियोजन विभाग क्र. मजुरी-२०११/प्र. १५/मग्रारो-१, दि. १९/३/२०११ अन्वये दरसूची निश्चित केली आहे. त्यात ४१ बाबी (Items) अंतर्भूत आहेत व त्याव्यतिरिक्त त्यातील जोडपत्र-४, ५ व ६ मध्ये अनुषंगिक अतिरिक्त बाबी व प्रतिदिन मजूरीप्रमाणे करावयाच्या उपबाबी दिल्या आहेत. या सर्व बाबींसाठी दिवसभरात ९ तास काम (त्यात १ तास विश्रांती) प्रमाणे नव्याने काम, काळ व वेग (Work Time Motion Study)करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

या करीता प्रथमतः करावयाच्या काम, काळ व वेग अभ्यासाचा, कालावधी, आवाका, कार्यपद्धती, जबाबदाऱ्या इ. बाबत शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| २.०० | अभ्यासाचा काळ | : | दिनांक १६ मे २०११ ते दि. २३ मे २०११ (सामाजिक वनीकरण व वन विभागाच्या काही बाबींचा अभ्यास मान्सून काळात) |
| २.०१ | अभ्यासाचे क्षेत्र | : | राज्यातील सर्व तालुके (शहरी तालुके वगळून) |
| २.०२ | कामांचा प्रकार | : | मग्रारोहयो योजनेअंतर्गत ज्या कार्यान्वयीन यंत्रणा जसे शासकिय/जिल्हापरिषद/ग्रामपंचायत इत्यादी जी कामे करीत आहेत त्यातून प्रत्येक तालुक्यात किमान पाच कामे अशा प्रकारे निवडावित की, दिनांक १९.३.२०११ च्या दरपत्रकातील ४१ बाबी तसेच जोडपत्र ४,५, व ६ मधील अनुषंगीक बाबीचा समावेश त्यात असेल व त्याचा अभ्यास करता येईल. |

२.०३ कामांची संख्या : प्रत्येक तालुक्यात वरील यंत्रणेची प्रत्येकी एक या प्रमाणे किमान पाच कामे.

२.०४ कामांची निवड : जिल्हयातील सर्व तालुक्यांमध्ये यंत्रणांनीकामांची निवड अशा प्रकारे करावी की ती कामे विविध टप्प्यावर (Stage) असावी जेणेकरुन यंत्रणा ज्या बाबींचा वापर जास्तीत जास्त करते अशा सर्व बाबी अभ्यासासाठी उपलब्ध व्हाव्यात व सर्व यंत्रणांच्या जिल्हयातील कामांत शक्यतो सर्व बाबींचा समावेश होईल हे पहावे.

२.०५ मजुरांच्या गटांची निवड : एका गटात सरासरी ८ ते १२ मजूर असावेत त्यात साधारण ५० टक्के पुरुष व ५० टक्के स्त्रिया व त्या अंतर्गत ५० टक्के १८ ते ३५ वर्ष व ३६ ते ५० वर्ष वयोगटाचे मजूर पुरुष व स्त्रिया असाव्यात.

२.०६ कामाची वेळ : सकाळी ८.०० ते संध्याकाळी ५.०० (त्यात १ तास विश्रांती)
ही वेळ स्थानिक परिस्थितीनुसार बदलता येईल.

२.०७ मजुरांकडील हत्यारे : कामावर वापरावयाची मजुरांची साधने कुदळ, फावडे, घमेले, इ.प्रमाणित (Standard) असावीत.

३.०० जबाबदारी : महसूल आयुक्त त्यांच्या विभागातील सर्व जिल्हयात सदर अभ्यास परिपूर्णरीत्या पूर्ण करुन घेण्यास जबाबदार राहतील. त्यांचे सदर काम पूर्णत्वास नेण्यास विभागातील सर्व जिल्हाधिकारी, मख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , संबंधित यंत्रणांचे जिल्हा व विभागीय स्तरावरील अधिकारी, आयुक्तांच्या सूचनांप्रमाणे कार्य करतील, त्यांना सहकार्य करतील व जबाबदार असतील. तसेच त्यांनी अभियांत्रिकी महाविद्यालय व तंत्रनिकेतन यांचेदेखील सहकार्य घ्यावे.

३.०१ : तसेच विभागीय आयुक्तांची सदर जबाबदारी पार पाडण्याकरिता वि.का.अ (मग्रारोहयो)प्रशासकीय तांत्रिक कार्य करतील. वि.का.अ. (कोकण विभाग) हे शासन स्तरावर देखील समन्वय व तांत्रिक मदत करतील. उपायुक्त (मग्रारोहयो) हे त्यांच्या कामात मदत व सहकार्य करतील.

४.०० सहकार्य : विभागातील जिल्हयातील अभियांत्रिकी महाविद्यालय, कृषि विद्यापीठ, तंत्र निकेतन यांचे सहकार्य घेण्यात यावे. कामावर मोजमापे, नोंदी, पर्यवेक्षण इत्यादी कामात मदत करण्यासाठी प्रत्येक कामासाठी दोन विद्यार्थी नेमून द्यावयाचे आहे. या सर्व कामात प्राचार्यांनी विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सहकार्य करावे.

४.०१ ज्या गावात अभ्यासाची कामे घेतली जाणार आहेत त्या गावच्या सरपंचानी संपूर्ण आवश्यक ते सहकार्य आयुक्त, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व यंत्रणेच्या अधिकारी, कर्मचारी व मजूरांना द्यावे.

४.०२ अभ्यासातील कामावर येणा-या मजूरांनी कामावर सर्व दिवस वेळेवर येऊन त्यांना देण्यात येणा-या सूचनांप्रमाणे कार्यवाही करुन सहकार्य करावे.

५.०० कामाची अंमलबजावणी :- अभ्यासासाठी निवडलेल्या प्रत्येक कामावर पर्यवेक्षण, मोजमाप घेणे, इत्यादी करिता दोन अधिकारी / कर्मचारी यंत्रणेने नेमावेत. उदा.कनिष्ठ अभियंता, कृषि सहाय्यक, इ. त्यांना मदत २ विद्यार्थी करतील. या संदर्भात प्रपत्रात नोंदी घेणे, मोजमाप घेणे, इ. कामांची संपूर्ण जबाबदारी अशा नेमलेल्या अधिकारी / कर्मचारी यांची असेल

५.०१ कामाचे मोजमाप :- दिवसातून दोन वेळा मोजमाप घ्यावयाचे आहे. दुपारी मजुरांना विश्रांतीची सुट्टी झाल्यावर व संध्याकाळी काम बंद झाल्यावर.

५.०२ कामांचे पर्यवेक्षण :- यंत्रणेच्या तालुका स्तरावरील अधिका-यांने अभ्यास काळात दररोज यंत्रणेच्या कामावर भेट द्यावयाची आहे. संबंधितांना मार्गदर्शन करावयाचे आहे. नोंदी वेळच्या वेळी योग्य घेतल्या आहेत किंवा नाही, मोजमापे योग्य प्रकारे नोंदली आहेत किंवा कसे हे पहावयाचे आहे व भेटपुस्तिकेत न चुकता शेरे नोंदविणे आवश्यक राहील. जिल्हास्तरावरील यंत्रणेच्या अधिका-यांनी दररोज किमान जिल्हयातील एका कामावर भेट द्यावी. जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, वि.का.अ (मग्रारोहयो) व आयुक्तांनी अभ्यासादरम्यान दोन, तीन कामांवर भेटी द्याव्यात.

५.०३ कामावर सोयी सवलती :- कामाच्या ठिकाणी विहित आदेशाप्रमाणे पिण्याचे पाणी, निवारा, इ. बाबी उपलब्ध असतील याची यंत्रणेने खात्री करावी.

५.०४ मजूरी :- मजूरांनी केलेल्या कामाच्या प्रमाणात सध्याच्या दरानुसार मजूरी अदा करावयाची आहे.

६.०० प्रशिक्षण : यंत्रणेच्या अधिकारी/कर्मचारी यांना वि.का.अ. (मग्रारोहयो) व यंत्रणेच्या विभागीय स्तरावरील अधिकाऱ्यांना एक दिवसीय प्रशिक्षण द्यावे.

६.०१ महत्व पटविणे: तहसिलदार व गट विकास अधिकारी यांनी संयुक्तरी त्या ज्या गावात काम घेतले जाणार आहे त्या गावाचे सरपंच व मजूर प्रतिनिधी यांची तालुका स्तरावर संयुक्त सभा घेऊन या अभ्यासाचे राष्ट्रीय महत्व पटवुन द्यावे.

७.०० समित्या: तग्रारोहयो खालील कामावरील अकुशल बाबींचा काम, काळ व वेग (Work, Time motion study ) च्या अभ्यासासाठी करावयाची विविध कामे, मार्गदर्शन, इत्यादिसाठी आयुक्त स्तरावर व जिल्हा स्तरावर समित्या असतील.

७.०१ जिल्हा स्तरावरील समिती:

| | | |
|---|---|---|
| १) जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| २) मु.का.अ. (जिल्हा परिषद) | - | सह अध्यक्ष |
| ३) उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) | - | सदस्य. |
| ४) कार्यकारी अभियंता (जिल्हाधिकारी कार्यालय) | - - | सदस्य सचिव |
| ५) परि.२.०२ मधील यंत्रणांचे जिल्हा स्तरावरील अधिकारी. | - | सदस्य |
| ६) जिल्हाधिका-यांनी जिल्हयातील निवडलेले प्राचार्य. | - | सदस्य |
| ७) उपजिल्हाधिकारी (रोहयो) | - | सदस्य |

सदर समितीने कामाची व गावांची निवड करणे, कर्मचारी वर्गाची निवड करणे सदर अभ्यास यशस्वी करणे व कामाची अंमलबजावणी करुन घेणे, इत्यादि जबाबदारीने पार पाडणे ही राहील.

८.०० एखादया तालुक्यात मजूर वा कामे नसल्यास तेवढी अतिरिक्त कामे जिल्हयातील दुसऱ्या तालुक्यात घ्यावीत.

९.०० अभ्यासातील कामांचे कार्यान्वयन करुन वेळोवेळी डिजिटल फोटो घेण्यात यावेत.

१०.०० अभ्यासासाठी करावयाच्या विविध कामांचे वेळापत्रक:-

१०.०१ जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने तालुकानिहाय कामांची संख्या व निवड करावयाची कार्यवाही - दिनांक २५ एप्रिल २०११ पर्यंत

१०.०२ जिल्हा समितीने निवड केलेल्या कामावर नेमावयाचे कर्मचारी व विद्यार्थ्यांची निवड करण्याची कार्यवाही - ३० एप्रिल २०११

१०.०३ जिल्हा समितीने निवडलेल्या कामांवर नेमावयाचे मजूरांचे गट निश्चित करणे - दिनांक ३० एप्रिल २०११ पर्यंत.

१०.०४ विशेष कार्य अधिकारी (मग्रारोहयो व विभागीय स्तरावरील यंत्रणेच्या अधिकाऱ्यांनी संबंधित निवड झालेल्या कामाची संबंधित अधिकारी, कर्मचारी व विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण- दिनांक ५ मे २०११ पर्यंत.

१०.०५ तहसिलदार व गटविकास अधिकारी, जिल्हा परिषद यांनी संयुक्तरीत्या संबंधित सरपंच व मजुरांचे प्रतिनिधी यांची तालुकास्तरावर संयुक्त सभा घेऊन अभ्यासाचे महत्व व राष्ट्रीय कर्तव्य समजावून सांगणे - दिनांक १० मे २०११ पर्यंत

१०.०६ विशेष कार्य अधिकारी (मग्रारोहयो) यांनी यंत्रणांना विहित प्रपत्रे उपलब्ध करुन देणे - दिनांक १० में २०११ पर्यंत

१०.०७ अभ्यास पूर्ण झाल्यावर प्रपत्रे तपासून यंत्रणेच्या तालुका स्तरावरील अधिकाऱ्यांनी जिल्हा स्तरावरील अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देणे - दिनांक २४ मे २०११.

१०.०८ यंत्रणेच्या जिल्हा स्तरावरील अधिकाऱ्यांनी जिल्हाधिकाऱ्यांकडे प्रपत्रे उपलब्ध करुन देणे - दिनांक २६ मे २०११

१०.०९ जिल्हाधिकाऱ्यांनी आयुक्तांकडे प्रपत्रे छाननी करुन पाठविणे - दिनांक २८ ते २०११.

११.०० सामाजिक वनीकरण व वन विभागाच्या विभागीय स्तरावरील अधिकाऱ्यांनी त्यांच्या कामातील ज्या बाबींचा अभ्यास मान्सूनमध्ये करावयाचा आहे त्याबाबत आयुक्तांना दिनांक २० एप्रिल २०११ पर्यंत कळवावे व त्यांच्या अभ्यासाचा कार्यक्रम आखून घ्यावा.

१२.०० अभ्याससाठी संबंधितांनाआवश्यक ती साधनसामुग्री, स्टेशनरी, झेरॉक्स इ. आयुक्तांनी उपलब्ध करुन द्यावीत. अभ्यासासाठी आवश्यक त्या प्रपत्रांचे नमुने दिनांक २५ एप्रिल २०११ पर्यंत संबंधित जिल्हाधिका-यांनी उपलब्ध करुन दयावी.

१२.०१ जिल्हाधिका-यांनी सदर विहित प्रपत्रे स्थानिकरीत्या विहित पध्दतीनुसार छापून उपलब्ध करुन घ्यावीत.

१२.०२ सदर कामासाठी आवश्यक त्या अधिकाऱ्यांना वाहने उपलब्ध करुन द्यावीत. त्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी गरजेनुसार वाहने अधिग्रहीत करावीत किंवा विहित पध्दतीनुसार भाडयाने घ्यावीत.

१२.०३ सदर अभ्यासाच्या कामासाठी जिल्हाधिका-यांनी आवश्यकता असल्यास तांत्रिक व इतर कर्मचारी वर्ग त्यांच्या सेवा अधिग्रहीत करुन उपलब्ध करुन घ्याव्यात.

१२.०४ अभ्यासाच्या काळात अधिकारी/कर्मचारी/मजुर अनुपस्थित राहणार नाहीत याची काळजी घ्यावी.

१२.०५ आयुक्तांकडे दि. २८ मे २०११ पर्यंत अभ्यास पूर्ण झालेली प्रपत्रे प्राप्त झाल्यावर त्यांचे पुढील संस्करण कसे करावे त्याबाबत शासन आवश्यक ते आदेश लवकरच देईल.

१३.०० या संबंधी येणारा खर्च महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत अनुज्ञेय प्रशासकिय खर्चामधून करण्यात येईल.

१४.०० सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०११०४१८१११६४६००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( व्ही. गिरीराज )
प्रधान सचिव

प्रत:-

मा. राज्यपाल
मा. मुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री
मा. मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव -
यांना विनंती आहे की, याबाबत जिल्हयांच्या भेटीत त्यांनी आढावा घ्यावा तसेच त्यांच्या अखत्यारित मग्रारोहयोच्या कार्यान्वीत यंत्रण असतील तर त्यांना याबाबत सूचना द्याव्यात.
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
संचालक तंत्रनिकेतन/अभियांत्रिकी,
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पूणे,
संचालक, मृदसंधारण,
संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे,
प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.